म्हटले म्हणजे सभोंवार काय परिणाम होतात, वगैरे किती तरी गोष्टी अशा आहेत कीं, ज्या आपणांला प्रत्यक्ष पहातां येत नाहींत. दिव्यदृष्टि किंवा सूक्ष्मदृष्टि ही ज्यानें प्राप्त करून घेतलेली असेल त्याला असले अदृश्य प्रकार दिसूं शकतात. अदृश्य सृष्टि पहाण्याची ही जी शक्ति आहे ती एक नैसर्गिक शक्ति आहे. डोळ्याला पहाण्याची शक्ति आहे. कानाला ऐकण्याची शक्ति आहे. या शक्ति जशा नैसर्गिक व स्वाभाविक आहेत तशी सूक्ष्मदृष्टि हीहि एक स्वाभाविक अशी शक्ति आहे. तींत सृष्टिक्रमाविरुद्ध असें कांहीं नाहीं. सर्व माणसांत ती आज बीजरूप आहे. उत्क्रान्तिक्रमांत ही शक्ति फुलणार आहे व सर्व माणसांना भविष्यकालीं ती स्वाभाविकरीत्या प्राप्त व्हावयाची आहे. एकाद्या माणसानें विशेष प्रयत्न केला तर आजही ती त्याला फुलवून संपादन करतां येईल. माणसाला जसा स्थूलदेह असतो, व डोळा, कान, नाक वगैरे इंद्रियें त्या स्थूल देहांत असतात व त्या इंद्रियांनीं त्याला ज्याप्रमाणें सभोंवतालच्या दृश्य सृष्टीचें प्रत्यक्ष ज्ञान मिळतें, तद्वत् माणसाला सूक्ष्म देह असतात, त्या देहांत कमी अधिक कार्यक्षम अशीं वेगळीं इंद्रियें असतात, त्या इंद्रियांनीं माणसाला अदृश्य गोष्टी प्रत्यक्ष पहातां येतात; आणि हें ज्ञान त्याला आपल्या मेंदूत आणतां आलें म्हणजे त्याला सूक्ष्मदृष्टि (दिव्यदृष्टि) आली असें आपण म्हणतों. ही सूक्ष्मदृष्टि नांवाची एक शक्ति (सिद्धि) खरोखरीच अस्तित्वांत आहे, हें ज्या माणसाला पटलेलें असतें, तो माणूस 'ही शक्ति कोणत्या मार्गानें प्राप्त होते?' असा प्रश्न विचारीत असतो. त्या प्रश्नासंबंधानें जनमनांत फार घोटाळा माजलेला आहे. तो घोटाळा दूर करून माणसाला सूक्ष्मदृष्टि कशी साध्य करून घेतां येते त्याची माहिती पुढें देण्याचा आमचा मानस आहे.

हा भानगडीचा विषय समजण्यास सुलभ व्हावा यासाठीं दिव्यदृष्टि साध्य करून घेणें म्हणजे काय, याचा प्रथम आपण खुलासा करूं या. प्रत्येक माणसाला जसा स्थूल देह असतो तसा वासनादेहहि असतो. जगांत जे वरच्या प्रतीचे मानववंश आहेत त्यांतलीं सुसंस्कृत माणसें घेतलीं तर असें आढळून येतें कीं त्या

सर्वांच्या वासनादेहाच्या इंद्रियशक्ति आज पूर्णपणें वाढलेल्या (फुललेल्या) आहेत; पण उपयोगांत न आणलेल्या हत्यारासारख्या सध्यां त्या नुसत्या पडून आहेत. उत्क्रान्तिक्रमांत अत्यंत सावकाशीनें त्यांची वाढ होत आलेली आहे; माणसाच्या अंतरंगांत इतक्या मंदगतीनें त्यांचा विकास झालेला आहे, कीं त्या शक्तींची दखलही माणसाला आलेली नाहीं; आणि म्हणून त्या शक्तींचा उपयोग करण्याची त्यानें स्वतःला बिलकुल संवय केलेली नाहीं. दृश्य देहाचीं इंद्रियें नेहमी आपले उद्योग जोरानें करीत असतात. सूर्याचा प्रखर प्रकाश जसा ताऱ्यांच्या मंद प्रकाशाला झांकून टाकतो, त्याप्रमाणें पहाणें, ऐकणें, बोलणें, विचार करणें, धांवपळ करणें वगैरे जे स्थूल देहाचे इंद्रियव्यापार असतात त्यांची गडबड व घरघर वासनादेहाच्या कोमल व उदयोन्मुख इंद्रियशक्तींना लुप्त करून टाकतात आणि त्यांना प्रकट होऊं देत नाहींत. दिव्यदृष्टि संपादन करून घेणें म्हणजे दोन गोष्टी करणें होय. दृश्यदेह स्तब्ध व शांत करून त्याच्या इंद्रियव्यापारांची गडबड व घरघर बंद ठेवणें ही एक गोष्ट; आणि वासनादेहाच्या इंद्रियशक्ति उपयोगांत आणण्याचा स्वतः सराव करणें, तें वळण स्वतःला लावून घेणें, ही दुसरी गोष्ट.

## अनिष्ट मार्ग

सूक्ष्मदृष्टि साध्य करून घेण्याचे अनेक मार्ग आहेत. त्यांतले कित्येक चांगले आहेत व कित्येक अनिष्ट आहेत. दृश्यदेहावर बळजबरी करणें, मारून मुटकून त्याच्या व्यवहारांस कांहीं काळ कुलूप घालणें या गोष्टींचा अवलंब अनिष्ट मार्गांमध्यें केला जातो. या गोष्टींनीं दृश्यदेहाला थोडा फार अपाय होत असतो. तसेंच या मार्गांत माणूस दुबळा व असहाय बनतो. त्याला यदाकदाचित् वासनादेहाचीं इंद्रियें उपयोगांत आणतां आलीं तरी तो दुर्बळ झाला असल्यामुळें त्याला त्या इंद्रियांवर स्वामित्व मिळत नाहीं. त्यामुळें त्यांचा उपयोग करण्याचें त्याला तारतम्य नसतें आणि सभोंवतालच्या वातावरणांतील वाईट गोष्टींपासून त्याला स्वतःचें संरक्षण करतां येत नाहीं. दृश्यदेहावर जबरी करण्याच्या या मार्गांत जी सूक्ष्मदृष्टि प्राप्त होते ती अल्पकालिक असते. जोंवर

देह जबरी केल्यामुळें मूर्च्छेसारख्या अवस्थेंत असेल तोंवरच ही सूक्ष्मदृष्टि कांहींकांना येत असते. या अनिष्ट प्रकारांपैकीं त्यांतल्या त्यांत जे थोडेसे बरे मार्ग आहेत, ते फारतर दृश्य देह असेपर्यंत माणसाला सूक्ष्मदृष्टि देऊं शकतात. नवा देह आल्यावर (म्हणजे पुढच्या जन्मांत) ती बरोबर येऊं शकत नाहीं. या अनिष्ट मार्गावर जो अभ्यास करावयाचा असतो तो फक्त जडदेहासंबंधाचा असतो. अर्थात् तो जडदेह मृत झाला कीं त्या मार्गानें मिळविलेली शक्तीहि नष्ट व्हावी यांत आश्चर्य वाटण्याजोगें कांहीं नाहीं.

उलटपक्षीं जे चांगले मार्ग आहेत ते जीवाचें देहावरील स्वामित्व वाढवितात; त्यामुळें जी शक्ति प्राप्त होईल ती जीवाच्या ( म्हणजे माणसाच्या ) स्वाधीन रहाते. तिचा त्याला हवा तसा विवेकानें उपयोग करण्याचें सामर्थ्य आलेलें असतें, आणि या मार्गावर जीव देहाचा स्वामी असल्यामुळें अदृश्य सृष्टींतील वाईट गोष्टींपासून तो स्वतःचें संरक्षण करण्यास समर्थ असतो. ज्या नव्या शक्ति येतात त्या जीवाला मिळतात, अर्थात् त्या कायमच्या असतात आणि पुढच्या जन्मीं नवा देह घेतला तरी त्या जन्मींही त्या उपलब्ध होतात. पण हे जे चांगले मार्ग आहेत त्यांवरील अभ्यासक्रम जास्त कठीण असतो. त्यांत नुसत्या देहाला शिस्त लावण्याचा भाग नसून मन शुद्ध करून स्वाधीन ठेवण्याचा खटाटोप करावा लागतो. अर्थात् काल अधिक लागतो. पण काल अधिक लागला तरी जें मिळतें तें कायमचें मिळतें व तें निर्दोष असतें.

प्रथम आपण अनिष्ट मार्गांचा विचार करूं या. या मार्गांवरचे कांहीं लोक भांगेसारखे पदार्थ घेतात. कांहीं लोक विस्तवावर धूप व विशिष्ट औषधि टाकून त्यांचा धूर घेतात. कांहीं लोक मानेला हिसडे देऊन तर कांहीं लोक गरगर फिरून देहाला मूर्च्छा आणतात आणि देहाचे व्यापार बंद करतात. भांग किंवा या औषधींचे धूर यांमध्यें माणसाला मूर्च्छित करण्याचा गुणधर्म आहे. गिरक्या घेणें, अतिशय मोठे उपासतापास करणें वगैरेंनींही देह थकतो व त्याला भोंवळ येते. मनुष्याला नैसर्गिक झोंप आली म्हणजे त्याचा वासनादेह त्याच्या दृश्य देहाबाहेर पडत

असतो, पण त्या झोपेंतून तो सहज जागा होऊं शकतो. वरील प्रकारांनीं देहाला मुद्दाम मूर्च्छा आणलेली असली म्हणजेही वासनादेह दृश्य देहाबाहेर जातो, पण त्या मूर्च्छेतून तो सहज जागा होऊं शकत नाहीं. मूर्च्छा आणण्याच्या अगोदर मी नवीन शक्ति ( दिव्यदृष्टि ) प्राप्त करून घेईन असा जोराचा संकल्प त्यानें केलेला असतो. म्हणून मूर्च्छेत असतांना त्या संकल्पानुसार तो वासनादेहाच्या इंद्रियांचा उपयोग करण्याची खटपट करतो, आणि बराच काल अभ्यास केल्यास त्याला तो उद्योग थोडा फार साध्य होतो. त्या मूर्छेतून तो जागा झाला म्हणजे वासनादेहानें मिळविलेल्या ज्ञानाची त्याला स्पष्ट अस्पष्ट व कमी अधिक आठवण रहाते. लोकांस तो त्या गोष्टी सांगतो व लोक त्याला 'अंतर्ज्ञानी' असें विशेषण लावूं लागतात. कधीं कधीं एकादा मृत माणूस त्याच्या मूर्च्छित शरीराचा उपयोग करून त्याच्या मुखानें कांहीं गोष्टी लोकांना सांगूं शकतो.

कधीं कधीं कांहीं माणसें एका काळ्या टिपक्यावर बराच वेळ दृष्टि लावून डोळ्याला थकवा आणितात व त्या क्रियेनें मेंदूतील विशिष्ट केंद्राला दमवून निर्व्यापार करतात. कित्येक लोक अन्य उपायांनीं स्वत:ला मेस्मेरिक किंवा हिप्नॉटिक अवस्थेंत नेतात. कांहीं लोक तोचतोच शब्दसमूह पुन: पुन: म्हणतात आणि असल्या जपानें मनाला मंदपणा आणून देहाला बधिर करतात.[१] अशा रीतीनें देहाचे जागृतींतील व्यापार बंद झाले म्हणजे वासनादेह थोडीफार भलीबुरी क्रिया करूं शकतो. पण असल्या सर्व मार्गांत माणसाला इष्टानिष्ट गोष्टींची निवड करतां येत नाहीं. वाईट नको म्हणतां येत नाहीं, चांगलें हवें म्हणतां येत नाहीं. फक्त वासनादेहाची

---

१ टेनिसन कवि स्वत:च्या नांवाचा जप करून मनाच्या एका उच्च व ज्ञानमय अवस्थचा अनुभव घेत असे. मनाची एक उच्च ज्ञानमय अवस्था असते व जप केल्यानें कांहीं माणसें त्या अवस्थेंत जाऊं शकतात या गोष्टीचा पुरावा टेनिसनच्या ह्या अनुभवांत जिज्ञासूला मिळण्याजोगा आहे. पण टेनिसनला अनिष्ट अनुभव आलेले नसले तरी तसले अनुभव या मार्गावर येणाचा संभव असल्यामुळें त्याला चांगला म्हणतां येत नाहीं. —अ. गो. का.

खिडकी कमी अधिक प्रमाणांत जणूं उघडतां येते व त्या खिडकीच्या समोर जें कांहीं त्या वेळीं असेल तें त्याला दिसूं शकतें; अणि प्रायशः उपयुक्त व चांगल्या प्रकारांपेक्षां घाणरडे अपायकारक प्रकारच त्याच्या टप्प्यांत येण्याचा संभव असतो.

कांहीं लोक प्राणायाम करतात. ते श्वासोच्छ्वास मंद करून फुप्फुसांत येणारी हवा कमी कमी करतात आणि त्यानें मूर्च्छा आणतात. ज्या तऱ्हेचा प्राणायाम हल्ली लोक करीत असतात त्यानें माणसाची प्रकृति बिघडण्याचा संभव असतो. एकाद्या वेळीं वासनादेहाच्या इंद्रियक्रिया प्राणायाम केल्यानें साधतात; पण त्यांचे दुष्परिणामच पदरीं पडल्याचीं बरींच उदाहरणें मीं पाहिलेलीं आहेत. उदाहरणार्थ, माझ्या सभोवतीं सर्वत्र भुतें बावरत आहेत असें माणसाला भासूं लागतें व तो भयभीत होऊन वेड लागण्याचा संभव उत्पन्न होतो. सूक्ष्म दृष्टि संपादन करण्याचा जुन्या काळीं एक हटयोगाचा मार्ग होता. तो जुना मार्ग ज्याला पूर्णपणें अवगत आहे अशा ज्ञानी पुरुषाच्या देखरेखीखालीं प्राणायाम केला तर तो भाग वेगळा. पण हल्लीं जो प्राणायामाचा प्रकार लोकांत चालू आहे त्यानें देहाला व मनाला अपाय होण्याचा संभव असतो. अपाय झालेलीं अनेक उदाहरणें माझ्या आढळांत आहेत.[१]

एकाद्या मेस्मेरिस्टाकडे जाऊन त्याच्याकडून स्वतःवर प्रयोग करून घ्यावा व आपण मेस्मेरिक निद्रेंत जावें असेंही माणसाला करतां येतें. मेस्मेरिस्ट लोक या स्थितींत माणसाच्या वासनादेहाच्या शक्तींना उत्तेजित करूं शकतात. पण हा मार्ग मला बिलकुल पसंत नाहीं. असल्या प्रयोगांत मेस्मेरिस्टाच्या ताब्यांत आपलें मन जात असतें, व त्याच्या स्वभावांतील वैगुण्यें आपल्या शीलामध्यें मलिनपणा उत्पन्न करण्याची शक्यता ह्या प्रयोगांत उद्भवते. मेस्मेरिझम् करणारा मनुष्य महान् साधु

१ हटयोग प्रदीपिकेंत म्हटलें आहे–"गुरूपदिष्टमार्गेण प्राणायामान् समभ्यसेत्" (२,१) म्हणजे गुरूनें घालून दिलेल्या मार्गानें प्राणायाम करावे; व "अयुक्ताभ्यासयोगेन सर्वरोगसमुद्भवः" (२,१६) म्हणजे अयुक्त रीतीनें अभ्यास केल्यास माणसाला सर्व रोग होऊं लागतात. –अ. गो. का.

असला तर असला परिणाम होणार नाहीं हें खरें; पण मेस्मेरिस्ट लोकांमध्यें ( किंवा जगांच्या बाजारांत इतरत्रही ) असले महान् साधु सांपडण्याचा संभव फारसा नसतो ! !

## चांगले मार्ग

दिव्य दृष्टि संपादन करण्याचे जे हितकर मार्ग आहेत त्यांच्याकडे आपण आतां दृष्टिक्षेप करूं या. त्यांत देहाला हट्टानें दबविण्याचा भाग नसतो, तर देहाला स्वाधीन ठेवण्याचें सामर्थ्य जीवाला आणून देण्याचा प्रयत्न असतो. माणसाची प्रगति होणें म्हणजे त्याच्या जीवनांतील सर्व अंगांचा विकास होणें होय, हें आपण प्रथमदर्शनीं लक्षांत ठेविलें पाहिजे. अध्यात्माच्या क्षेत्रांत माणसाचा विकास व्हावयाचा म्हणजे त्याची बुद्धिमत्ता, त्याची नीतिमत्ता, त्याची कर्तृत्वशक्ति, त्याचे नाना सद्गुण, त्याची नाना सामर्थ्यें, त्याची चित्तशुद्धि, त्याचें आत्मसमर्पण वगैरे सर्व बाजूंनीं विकास व्हावयाचा असतो. त्या अनेक बाबींमध्यें माणसाला सूक्ष्म दृष्टि येणें ही फक्त एक गोष्ट आहे. तेव्हां बाकीच्या बाबींकडे दुर्लक्ष करून फक्त सूक्ष्म दृष्टि मिळविण्याचा प्रयत्न करणें हें बिलकुल शहाणपणाचें नाहीं. पोहतां येणें किंवा सायकल चालवितां येणें या कलांकडे आपण ज्या तऱ्हेनें पहातों त्या तऱ्हेनें आपण सूक्ष्म दृष्टि संपादन करण्याच्या गोष्टीकडे पहातां कामा नये. ज्याला पोहण्याची किंवा सायकल चालविण्याची कला शिकावयाची असेल, त्याला बुद्धिमत्ता, नीतिमत्ता, चित्तशुद्धि, आत्मसमर्पण वगैरे ज्या गोष्टी आहेत त्यांकडे संपूर्णपणें दुर्लक्ष करूनहि त्या कला शिकतां येतात. पण सूक्ष्म दृष्टि संपादन करावयाची असल्यास, पोहण्यासारखी किंवा सायकल चालविण्यासारखी ती एक कला आहे असें न मानतां, अध्यात्ममार्गावर माणसाचा जो चहूं बाजूंनीं विकास व्हावयाचा असतो त्यापैकीं सूक्ष्म दृष्टीची संपादना ही एक बाब आहे असें समजून माणसानें त्या सर्वांगीण प्रगतीची खटपट करीत रहाणें अवश्य असतें.

दिव्यदृष्टि संपादन करण्याबाबत सर्वांत उत्तम मार्ग म्हणजे तज्ज्ञ गुरूकडे जाऊन तो सांगेल तें करणें हा होय. पण असा तज्ज्ञ

गुरु कोठें सांपडेल? स्वतःची गुरु म्हणून जाहिरात देणाऱ्या मंडळींत, किंवा इतके पैसे दिलेत तर अमुक गुपित शिकवूं असें म्हणणाऱ्या लोकांत तो सांपडणार नाहीं. जेथून असलें ज्ञान पूर्वापार मिळत आलेलें आहे तेथूनच तें आजहि मिळण्याजोगें आहे. ज्यांना या विषयाचें संपूर्ण ज्ञान आहे अशा ऋषितुल्य ज्ञानी पुरुषांचा एक महान् संघ आपल्या पृथ्वीवर अनादिकाळापासून आज तागायत अस्तित्वांत असून कार्य करीत आहे. जिज्ञासूंना साहाय्य देणें व मार्गदर्शन करणें हें त्यांचें एक अंगीकृत काम असल्यामुळें आपलें ज्ञान योग्य माणसाला देण्याची त्यांची सदा तयारी असते. आपणाला स्थूल शरीरांत त्या महाभाग पुरुषांची गांठभेट होऊं शकणार नाहीं; आणि जरी झाली तरी आपणांला त्यांची ओळख पटण्याचा संभव नाहीं. माणसाची रिकामटेकडी जिज्ञासा ते कधींहि भागवीत नाहींत. आपल्या स्वतःच्या फायद्याकरितां ज्यांना दिव्यदृष्टि हवी असेल त्यांना त्यांचें मार्गदर्शन लाभणार नाहीं. फक्त सत्पात्र माणसांशींच ते स्वतःचा ऋणानुबंध जोडतात आणि त्यांना मार्गदर्शन करतात. जो माणूस सदा परोपकारार्थ आपल्या सर्व शक्तींचा विनियोग करीत असतो, ज्यानें आपली चित्तशुद्धि केलेली आहे, ईश्वरी योजना ओळखून त्यांतील आपला कार्यभाग उचलण्याचा ज्याचा निर्धार आहे, अशांनाच ते सत्पात्र म्हणून निवडतात आणि साहाय्य करतात. या संघांतील ज्ञानी पुरुषांनींच जगांतील सर्व धर्म प्राचीन काळीं स्थापलेले आहेत. अलीकडच्या काळीं थिऑसफिकल सोसायटीची स्थापनाहि त्यांनींच केलेली आहे. पण जगांतील एकाद्या धर्माचा नुसता अनुयायी होऊन किंवा थिऑसफिकल सोसायटीचा नामधारी सभासद होऊन अथवा माणसाची अधिक तयारी करण्याकरितां काढलेल्या थिऑसफींतल्या अंतःशाखेंत ( Inner School ) शिरून कार्यभाग साधणार नाहीं. थिऑसफिकल सोसायटींतल्या कांहीं व्यक्तींशीं त्यांनीं ऋणानुबंध जोडले आहेत हें जरी खरें असलें, तरी ते माणसाच्या अंतरंगाची खरी परीक्षा करूं शकतात हेंही खरें आहे. कोणाशीं ऋणानुबंध जोडावा ही सर्वस्वीं त्यांच्या हातांतली गोष्ट आहे. वर लिहिल्याप्रमाणें ज्याची

खरोखरी तयारी झाली असेल त्याला ते ओळखतात व साहाय्य देतात. याबाबत खऱ्या सत्पात्र माणसाची उपेक्षा होणें शक्य नसतें.

वर लिहिल्याप्रमाणें जर त्या ज्ञानी पुरुषाशीं संबंध जोडण्याची खटपट माणूस निर्धारानें करीत असेल आणि आपणांला सूक्ष्मदृष्टि प्राप्त व्हावी अशी जर त्याची मनीषा असेल तर ती सूक्ष्मदृष्टि त्याला साधणें शक्य आहे. माणसानें स्वतःची बुद्धिमत्ता वाढविण्याची खटपट केली अथवा स्वतःच्या शीलांत भक्तीची बांधणी करण्याची खटपट केली, तर त्या गोष्टी साधणें जसें शक्य असतें, तद्वत् योग्य मार्गानें सूक्ष्मदृष्टि संपादन करण्याची त्यानें खटपट केली तर तेंहि साधणें शक्य असतें. ज्यांनीं चिकाटी धरून असले प्रयत्न केले आहेत, त्यांचे प्रयत्न यशस्वी झाल्याचीं अनेक उदाहरणें मला माहीत आहेत.

ह्या प्रयत्नास लागण्याच्या अगोदर आपल्या ठायीं बुद्धीची आणि नीतीची चांगल्या प्रकारची वाढ झाली आहे याची आपण खात्री करून घेतली पाहिजे. तसें नसेल तर सूक्ष्म दृष्टि हा वर नसून शाप आहे असें होईल; कारण तुमचें कमकुवत व स्वार्थी मन सूक्ष्म दृष्टीचा दुरुपयोग करील आणि तुमच्या पूर्वीच्या स्थितीपेक्षां नंतरची स्थिति अधिक वाईट होईल. आपली नैतिक व बौद्धिक पातळी पुरेशी उच्च आहे, आपल्या वैयक्तिक फायद्यास बाध येत असला तरी आपण सत्य सोडणार नाहीं, सर्व गोष्टी आपण निस्स्वार्थीपणानें करूं, आणि जगाच्या कल्याणासाठीं झटण्यांत आपण स्वतःला पूर्णपणें विसरून जाऊं, हें म्हणण्याइतकी जर तुमची पूर्वतयारी झाली असेल, तर सूक्ष्मदृष्टि संपादन करण्याच्या इष्ट अशा दोन पद्धति तुम्हांला सुचविण्याजोग्या आहेत. त्या पद्धतींत कोणताही धोका नाहीं. मात्र त्या दोन्ही कठिण आहेत. त्यांतली पहिली सर्वांना जमण्यासारखी नाहीं. पण दुसरी मात्र सर्वांना अभ्यासितां येण्याजोगी आहे.

## चतुर्थ–मान

ज्याची गणितशास्त्रांत गति असेल त्याच्याकरतां ही पहिली पद्धति आहे. प्रत्येक पदार्थाला लांबी, रुंदी व जाडी अशीं तीन मापें

किंवा Dimensions असतात हें आपण जाणतों. एकाद्या जिनसेची लांबी, रुंदी, व जाडी यांचीं मापें घ्यावयाचीं असलीं तर आपण फूटपट्टी घेऊन एका रेषेनें लांबी मोजतों, त्या रेषेशीं काटकोन करून आपण रुंदी मोजतों व या दोन्ही रेषांशीं काटकोन करून आपण जाडी मोजतों. परस्परांशीं काटकोनांत असणाऱ्या या तीनच दिशा आपल्या मनाला आकलन होतात आणि म्हणून प्रत्येक वस्तूला लांबी, रुंदी व जाडी अशीं तीनच मापें असतात (तीनच 'मानें' असतात,–तीनच बाजू असतात'–तीनच मुखें असतात, ) असें आपण म्हणतों. पण खरोखरी फक्त तीन मापें अस्तित्वांत नसून अधिक मापें अस्तित्वांत आहेत. मात्र त्यांपैकीं फक्त तीनच आकलन करण्याची माणसाच्या मेंदूला शक्ति आहे. पण वासना-देहाच्या जाणिवेला चार मापें आकलन करण्याची कुवत असते. लांबी, रुंदी, व उंची ह्या काटकोनांत असलेल्या ज्या तीन दिशा ( रेषा ) आहेत, त्या सर्वांशीं काटकोन करणारी आणखी एक चवथी दिशा त्या जाणिवेच्या आवाक्यांत येऊन तिला ती आकलन होते. ही जी चवथी दिशा आहे तिला चतुर्थ मान असें म्हणतां येईल. इंग्रजींत तिला Fourth Dimension असें म्हणतात. वासनादेहाच्या जाणिवेला अंतराळ म्हणजे लांबी व रुंदी व उंची अशीं तीन मापें असलेली पोकळी होय इतकेंच समजतें असें नाहीं, तर त्या अंतराळाला आणखीही एक माप आहे, आणखीही एक दिशा आहे, आणि हें नवीन माप लांबी रुंदी व उंची (किंवा जाडी) या सर्वांशीं काटकोनांत असतें हें आकलन करण्याची कुवत असते. अर्थात् आपल्या सभोंवार असलेल्या प्रत्येक जिनसेला लांबी, रुंदी व उंची ह्या जशा तीन बाजू असतात– तीन मुखें असतात– तशी आणखी एक चवथी बाजू अथवा एक चवथें मुख आहे हें माणसाच्या वासनादेहाला जाणवतें. गणित-शास्त्रांत डोकें घालून ह्या चतुर्थ मानाचें स्वरूप मनानें आकलन करण्याचा, तें मनाच्या आटोक्यांत आणण्याचा माणसानें एक-सारखा प्रयत्न चालू ठेवला, तर त्या प्रयत्नांनीं त्याच्या मेंदूवर इष्ट दिशेचा ताण पडून त्यावर विशिष्ट प्रकारचे संस्कार होतात,

आणि असल्या प्रयत्नांनीं माणसाला सूक्ष्म दृष्टि प्राप्त होते. पण ही पद्धति सर्वांस अवलंबितां येण्यासारखी नाहीं. चतुर्थ मानाची कल्पना मनासमोर नीटपणें आणण्याइतकें ज्याला गणिताचें ज्ञान असेल त्यालाच ती साधेल हें उघड आहे.

## ध्यानाचा मार्ग

दुसरा जो मार्ग आहे तो फक्त एका मनोवृत्तीच्याच लोकांकरतां नसून सर्वांस उपयोगी पडण्याजोगा आहे. पण कोणताहि मार्ग घेतला तरी माणसाच्या पदरांत किती यश पडेल व तें किती वेळांत पडेल हें कोणालाहि नक्की सांगतां येणार नाहीं. कॉलेजमध्यें गणित विषय घेतल्यास मी पहिल्या दर्जाचा गणितज्ञ होईन का? असा विद्यार्थ्यानें आपल्या प्राध्यापकास प्रश्न केला तर तो म्हणेल कीं बाबा, जर तुला गणितशास्त्राची अगोदरच आवड असली, शाळेंतील परीक्षांत जर तुला गणितांत बरेच मार्क पडले असले, गणित विषय तुला चटदिशीं आकलन होत असला, आणि शाळेंतील अभ्यासांत गणितांतलीं उदाहरणें तुला चटाचट सुटून त्या विषयांत प्रावीण्य मिळालें असलें, तर कॉलेजांत गणित विषय घेऊन तुला मोठा गणितज्ञ होतां येणें शक्य आहे. पण कॉलेजांत जाण्याच्या अगोदर जर तुझी इतकी पूर्वतयारी झालेली नसली तर तूं मोठा गणितज्ञ होणें संभवनीय नाहीं. कॉलेजांत तूं गणित विषय घेतलास तर तुझी गणितांत कांहीं प्रमाणांत प्रगति होईल, पण तूं बहुधा मोठा गणितज्ञ होणार नाहींस. माझी गणितांत किती प्रगति होईल असें विद्यार्थ्यानें विचारल्यास प्राध्यापक सांगेल कीं तें कोणालाहि नक्की सांगतां येणार नाहीं; कारण तुझी गणितांतली पूर्व तयारी कितपत आहे, कॉलेजांत तूं किती वर्षें गणित शिकशील, आणि गणित विषयावर किती परिश्रम करशील, वगैरे अनेक गोष्टींवर तें अवलंबून आहे. सर्व प्रकारच्या प्रगतीला हीच विचारसरणी लागू आहे. कोणत्याहि विषयांत माणूस जात्याच जी हुशारी दाखवितो ती त्याची पूर्वजन्माची तयारी असते. ज्याची पूर्वींची कमाई मोठी असेल तो या जन्मीं

जास्त जलद प्रगति करतो आणि त्याच्या पदरांत अधिक यश लवकर पडतें. ज्याची पूर्व तयारी कमी असेल किंवा अजिबात नसेल त्यानें तितकाच अभ्यास केला तरी त्याची प्रगति शीघ्रगतीनें होत नाहीं. म्हणून अमुक वर्षांत इतपत सूक्ष्मदृष्टि साध्य होईल असें सांगतां येणार नाहीं. भिंत फोडून तींत सूक्ष्मदृष्टीची खिडकी तयार करावयाची असली, तर भिंत किती जाड आहे, ती फोडण्या-करितां माणूस किती जोरानें तीवर हातोडे मारीत आहे, या गोष्टींवर किती वेळानें भिंतीला भगदाड पडेल तें अवलंबून असतें. जोरानें हातोडयाचे घाव मारून अनेकांना भिंतीला भोक पाडतां आलेलें आहे, इतकाच अनुभव मी माझ्या वाचकांसमोर ठेवूं शकेन.

मी ज्या मार्गाचें आतां वर्णन करणार आहें तो ध्यानाचा[१] मार्ग आहे. तो निरनिराळ्या धर्मांत कमी अधिक स्पष्टपणानें नमूद केलेला आहे. त्या मार्गानें माणूस पुढें गेला आणि या जन्मांत त्याला सूक्ष्मदृष्टि प्राप्त न झाली, तरी त्याचे श्रम वायां गेले असें बिलकुल म्हणतां येणार नाहीं. दोन फूट जाडीची दगडी भिंत असली व तींत भोंक पाडण्यासाठीं माणसानें तिच्यावर घणाचे घाव घातले व दगडांच्या कपऱ्या खालीं पडल्या तर भिंत पातळ होत जाईल आणि तिला भोंक पडण्याचा काळ जवळ येत जाईल. पण भिंत पातळ होत चालली आहे हें आपण विसरलों आणि अद्याप भोंक पडून भिंतीपलीकडचें दृश्य दिसूं लागलें नाहीं म्हणून सर्व श्रम फुकट गेले असें म्हणावयास लागलों तर तें बरो-बर होईल का ? एका दिवसांत दोन फूट जाडीची भिंत घणांच्या घावांमुळें एक फूट जाडीची राहिली, तर दुसऱ्या दिवशीं ती लवकर फुटेल हें उघड आहे. ध्यानाच्या मार्गावर सूक्ष्मदृष्टि मिळविण्या-

---

१ टीप या लेखांत ध्यान, धारणा वगैरे जे शब्द योजण्यांत आलेले आहेत ते सामान्य अर्थानें योजलेले आहेत. पतंजलींच्या योगसूत्रांत त्यांचा जो विशेष अर्थ करण्यांत येतो तो अर्थ येथें अभिप्रेत नाहीं. या मार्गावरील तीन पायऱ्यांस श्री. लेडबीटर यांनीं Concentration, Meditation व Contemplation अशीं इंग्रजी नांवें दिलीं असून आम्ही त्यांस एकाग्रता, ध्यान व धारणा असें येथें म्हटलें आहे —अ. गो. का.

साठीं माणूस जे प्रयत्न करतो त्यानें नीतिमत्ता, चित्तशुद्धि, आत्म-संयमन वगैरे गोष्टींत त्याची प्रगति होत असते. एकाग्रता, ध्यान, या गोष्टींतहि त्याची प्रगति होत असते. जरी सूक्ष्म दृष्टीची प्राप्ति न झाली, तरी पदरांत पडलेली ही प्रगति पुढच्या जन्मीं त्याच्या बरोबर येते व आयत्या भांडवलासारखी उपयोगी होते. माणसाला केव्हां तरी हा प्रयत्न करणें जरूर आहे. मग आज-पासूनच त्याची सुरवात कां करूं नये ? इष्ट टप्पा जरी गांठतां आला नाहीं तरी आज जितकें अंतर चालून झालें तितकें उद्यां कमी चालावें लागेल ना ? हा विचार माणसानें करावा असें मी म्हणेन.

मी वर सांगितलेंच आहे कीं पृथ्वीवर ज्ञानी अशा ऋषि-तुल्य पुरुषांचा एक संघ आज अस्तित्वांत आहे. त्यांतील ज्ञानी पुरुष योग्य माणसाशीं स्वतःचा ऋणानुबंध जोडतात व त्याला शिष्यत्व देऊन मार्गदर्शन करतात. असल्या ज्ञानी लोकांशीं शिष्य-त्वाचा संबंध जोडून त्यांच्या साहाय्यानें स्वतःची अध्यात्मप्रगति करण्याचा एक मार्ग अस्तित्वांत आहे. त्याला मुमुक्षु मार्ग म्हणतां येईल. या मुमुक्षु मार्गास लागून त्यावर स्वतःची प्रगति कराव-याची असली तर त्यासाठीं काय काय केलें पाहिजे याची माहिती जे. कृष्णमूर्ति कृत At the Feet of the Master व मीं लिहिलेल्या The Masters and the Path या दोन पुस्तकांत चांगल्या रीतीनें दिली आहे. ज्याला सूक्ष्मदृष्टि प्राप्त करून घ्यावयाची असेल त्यानें सूक्ष्मदृष्टि मिळविण्याचा उद्योग हा एक स्वतंत्र उद्योग आहे असें न मानतां मुमुक्षुमार्गावरून पुढें जाण्याच्या सर्वांगीण उद्यो-गांतला एक भाग आहे अशा दृष्टीनें त्याच्याकडे पाहिलें पाहिजे, आणि मुमुक्षुमार्गावरील आवश्यक त्या सर्व खटपटी करीत राहिलें पाहिजे. त्या खटपटींत नीतिमत्तेचा व चित्तशुद्धीचा पुष्कळ भाग येतो हें मीं वर सांगितलेंच आहे. स्वतःचे स्थूल व सूक्ष्म देह स्वच्छ व निर्मळ ठेवणें, त्यासाठीं मद्य, मांस, तंबाकू हीं वर्ज करणें, हाही भाग त्यांत येत असतो. उच्च जीवनासाठीं या मलिन गोष्टी जो सोडायला तयार नसेल त्यानें आपल्या स्वतःच्या जबाब-दारीवर आपला मार्ग सुधारावा; मला विचारूं नये व माझेवर

जबाबदारी घालूं नये. असल्या संवयींमुळें माणसाला सूक्ष्मदृष्टि बिलकुल प्राप्त होणार नाहीं, असें मी म्हणत नाहीं मी इतकेंच म्हणतों कीं असल्या घाणेरड्या गोष्टी करणाराला धोका असतो. पवित्र वस्तूंस घाणेरड्या हातानें स्पर्श करणें योग्य नाहीं. एकाच वेळीं देव व सैतान या दोघांची पूजा करणें धोक्याचें असतें.

## मनाची एकाग्रता

आतां या मार्गाची माहिती सांगतों. अंतर्दृष्टि मिळविण्याची या मार्गावरील पहिली पायरी म्हणजे मनाची एकाग्रता होय. एकाग्रता म्हणजे मनावर अशा तऱ्हेचा ताबा मिळविणें कीं त्या मनाकडून हुकमीपणानें वाटेल तें काम करून घेतां येईल, आणि तें इष्ट गोष्टीवर जरूर तितका वेळ निश्चल ठेवतां येईल. ही गोष्ट प्रयत्नसाध्य आहे. निर्धारानें माणसाला ती साधूं शकते. पण ती सोपी नाहीं. उलट ती कठिणांतील कठीण गोष्ट आहे. आपलें मन किती भटकतें त्याची माणसाला कल्पना नसते. रस्त्यांतून चालत जातांना अथवा आगगाडींतून प्रवास करतांना एकदम मनाला थांबवून धरा, आणि आपल्या मनांत कोणते विचार चालू आहेत व कां चालू आहेत तें तपासा. क्रमानें मागें मागें जाऊन ते ते विचार कोठून उद्भवले त्याचा छडा लावा, म्हणजे मागील पांच मिनिटांत किती असंबद्ध विचार तुमच्या मनांत शिरून बाहेर गेले याची कल्पना तुम्हांला येऊन तुमचें तुम्हांलाच आश्चर्य वाटेल. असें वारंवार तुम्ही केल्यास तुम्हांस हळूहळू समजून येईल कीं हे तुमचे सारे स्वतःचे विचार नाहींत; तर इतर लोकांनीं वातावरणांत सोडलेल्या विचारांचा कचरा आपल्या मनांतून वाहात आहे. माणसाच्या मनांत विचार आला कीं त्याच्या सभोवतालच्या वातावरणांत विशिष्ट आकृति उत्पन्न होते. सामान्यतः बहुजनांचे विचार जोरकस नसल्यामुळें त्या विचारांपासून निर्माण झालेल्या आकृति त्याच्या भोवतीं थोडा वेळ तरंगत रहातात आणि नंतर विरून जातात. आपण रस्त्यांतून चालत असलों किंवा एकाद्या खोलींत गेलों तर विरूं लागलेल्या या विचारांच्या झुंडीच्या झुंडी आपल्या मनांत वहात येऊन क्षणमात्र आपलें मन वेधतात.

सामान्यतः ह्या आकृति निस्सत्त्व व निरर्थक असतात. माणसानें हें सारें बंद केलें पाहिजे. आपण आपल्या मनाला मुद्दाम स्वतः काम नेमून दिलें पाहिजे. मनाचे इतर खेळ थांबविले पाहिजेत, आणि लोकांचे निरर्थक विचार आंत येण्याचा दरवाजा अजिबात बंद केला पाहिजे. आपण मनाचे नोकर न होतां मन आपलें नोकर झालें पाहिजे. आपण ठरवतों त्या गोष्टी आपलें मन करीत नाहीं, तें भलत्याच गोष्टी करीत असतें. आपण आपल्या हातानें टेबलावरील पुस्तक उचलून तें दुसरीकडे ठेवण्याचा संकल्प केला आणि आपला हात टेबलाकडे न जातां दुसरीकडेच जाऊं लागला तर आपला हात निरुपयोगी झाला आहे, किंवा हाताला अर्धांगवायु झाला आहे असें आपण म्हणूं. माणसाचें मन संकल्पित गोष्टी करूं शकत नाहीं, भलत्याच गोष्टी करतें, याचा अर्थ असा कीं मनाला अर्धांगवायूसारखी व्यथा झाली आहे व तें आपल्या स्वाधीन नाहीं. हें सर्व बदलून माणसानें मनाची एकाग्रता साधली पाहिजे. आपणांला जें हवें तेंच आपलें मन करील, इतर गोष्टी करणार नाहीं इतकें तें स्वाधीन झालें पाहिजे. माणसाला रोज ज्या लहान सहान गोष्टी कराव्या लागतात त्यांत त्याला एकाग्रता शिकण्याची भरपूर संधि मिळूं शकते. आपण जें जें काम करीत असूं त्यावर सारें लक्ष लावावें, आपण पत्र लिहीत असलों तर त्या क्रियेवर मन एकाग्र करावें व पत्र संपेपर्यंत दुसऱ्या विचारांना मनांत थारा देऊं नये; पुस्तक वाचीत असलों तर सारें अवधान पुस्तकाकडे लावून ग्रंथकर्त्याचा संपूर्ण अभिप्राय आकलन करावा; असें केल्यानें आपलें पत्रलेखन व ग्रंथवाचन जास्त चांगलें होईल व मनहि एकाग्रता शिकेल. अशा रीतीनें अष्टौ प्रहर माणसानें आपल्या मनाला वळण लावून एकाग्रता शिकविली पाहिजे. मनाचा उपयोग करूनच दिव्यदृष्टि संपादन करावयाची असते. जें मन सर्वस्वीं आपल्या स्वाधीन राहील त्याचाच या कामीं उपयोग होऊं शकतो.

## ध्यान

चांगल्या प्रकारची एकाग्रता साध्य झाल्यावर मग पुढच्या पायरीवर पाऊल टाकतां येईल. ही पुढची पायरी सोपी नाहीं.

तीही अवघड आहे. ती कित्येकांना साधली आहे. तेव्हां तुम्हीहि पुरेशी चिकाटी धरल्यास तुम्हांसहि ती साधणें अशक्य नाहीं. या पायरीला मी 'ध्यान' असें नांव देत आहें. तुम्ही ध्यानाकरतां अशी वेळ शोधून काढा कीं त्या वेळीं तुम्हांला दुसरें व्यवधान असणार नाहीं. प्रातःकाळची वेळ उत्तम. पण हल्लीच्या युगांत लोकांची दिनचर्या अशी विचित्र झाली आहे कीं पुष्कळांना प्रातःकाळ जमत नाहीं. तेव्हां ध्यानासाठीं तुम्हांस सोयिस्कर होईल अशी वेळ ठरवा, रोज त्याच ठराविक वेळीं ध्यानाला बसा, आणि ध्यानाचा अभ्यास केल्याखेरीज एकही दिवस जाऊं देऊं नका. विशिष्ट प्रकारची तयारी करण्याकरितां जर शारीरिक व्यायाम घ्यावयाचा असला, तर दर रोज नियमित व्यायाम घेतल्यानें जितका उपयोग होतो तसा एक दिवस जोराचा व्यायाम करणें व चार दिवस कांहींच न करणें या अव्यवस्थितपणाचा होत नाहीं, हें तुम्हांस माहीत आहेच. ध्यानाला तोच न्याय लागू असल्यामुळें खाडा न करतां नियमितपणानें ध्यान करणें अत्यंत महत्त्वाचें आहे.

कोणताही व्यत्यय येणार नाहीं अशा ठिकाणीं ध्यानासाठीं आरामांत बसा; आणि एकादा उच्च व उपयुक्त असा विषय निवडून एकाग्रता शिकलेलें तुमचें मन त्या विषयावर लावा. थिऑसफीय अभ्यासांत माणसाच्या मनाला आवडण्याजोगे हवे तितके उच्च व उपयुक्त असे विषय समाविष्ट आहेत. त्यांतला हवा तो निवडून घ्या. वाटलें तर एकादा सद्‌गुण निवडा. मनांत तो सद्‌गुण घोळवा, तो सद्‌गुण ईश्वरी योजनेमध्यें कसा आवश्यक आहे, तुमच्या सभोंवार सृष्टींत तो कसा प्रतिबिंबित झाला आहे. पूर्वींच्या मोठ्या व्यक्तींमध्यें तो कसा आविर्भूत झाला होता, आपणा स्वतःला आपल्या दैनंदिन जीवनांत तो कसा प्रकट करतां येईल, आपणांला यापूर्वीं तो कां प्रकट करतां आला नाहीं वगैरे गोष्टी मनानें पहा. अशा रीतीनें एकाद्या सद्‌गुणावर ध्यान केलें तर त्याचा माणसाला फार उपयोग होतो. मनाला तालीम मिळते, इतकेंच नव्हे तर मनाच्या पार्श्वभूमींत त्या गुणाचा विचार

सदा उपस्थित राहिलेला असतो. पुष्कळ लोकांना ध्यानासाठीं प्रारंभीं सोपे व साधे विषयच झेंपतील; आणि त्यांत सौकर्य आल्यावर मगच सद्‌गुणांसारखे अवघड व तात्त्विक विषय निवडतां येतील.

मध्यें खंड पडूं न देतां हा ध्यानाचा रोज अभ्यास चालू ठेवा. ध्यान करतांना मनावर ताण पडत नाहीं, कोणतीही अडचण येत नाहीं, आणि एकहि भटकणारा विचार मनांत शिरत नाहीं इतका अभ्यास पक्का झाला म्हणजे तिसऱ्या पायरीकडे—म्हणजे धारणेकडे वळायला हरकत नाहीं. पण लक्षांत ठेवा कीं मनाच्या भटकण्यावर संपूर्ण ताबा मिळाल्याशिवाय धारणेंत यश मिळणार नाहीं. ध्यान करतांना माणसाला वारंवार आढळतें कीं आपले विचार आपणाला नकळत एकदम भलतीकडे गेले आहेत. मुद्दाम तपासून पहावें तेव्हांच ते किती लांब गेले आहेत तें लक्षांत येतें. सर्वांनाच असली अडचण येत असते. पण निराश न होतां चुकार मनाला दर वेळीं पूर्वस्थळीं आणा. शंभरदां किंवा हजार वेळां हें करावें लागतें, तरी तसें करीत बसा. तेव्हांच ध्यान साधलें असें म्हणतां येईल.

## धारणा

तिसऱ्या पायरीवर काय करावें लागतें? जे इतर विषय तुम्ही ध्यानासाठीं निवडीत होतां ते सारे बाजूस ठेवून तुमच्या कल्पनेप्रमाणें जें तुमचें सर्वांत उच्च आध्यात्मिक ध्येय असेल तें ध्यानासाठीं घ्यावयाचें असतें. त्या ध्येयाला नांव कांहींही द्या. त्याचा प्रश्न नाहीं. मनुष्य हिंदु असला तर त्याला भगवान् श्रीकृष्ण हें परमोच्च ध्येय वाटेल, बुद्धधर्मी असला तर भगवान् बुद्ध हें परम ध्येय वाटेल, थिऑसफिस्ट असला तर वर सांगितलेल्या ज्ञानी पुरुषांच्या संस्थेपैकीं एकादा जीवन्मुक्त—ज्याला आम्ही मास्टर म्हणतों तो—त्याला निवडावासा वाटेल. कोणतें ध्येय निवडतां तो प्रश्न नाहीं. त्याला नांव काय देतां तोही प्रश्न नाहीं. कारण आपण आतां सत्य वस्तुस्थितीचा विचार करीत आहों.

मुख्य मुद्दा हा कीं जें तुम्ही निवडाल तें तुमचें सर्वोच्च ध्येय असलें पाहिजे; तुमच्या हृदयांत आदर, प्रेम, भक्ति या भावनांचा वर्षाव अत्युत्कटतेनें करील असें तें ध्येय असलें पाहिजे. या ध्येयमूर्तीचें जितकें जिवंत मनोमय चित्र मनापुढें उभें करतां येईल तितकें करा व आपल्या हृदयांतल्या अति उत्कट भावना त्या विभूतिचित्रावर ओता. आपल्या अंतर्यामींच्या सर्व शक्ति एकत्रित करून स्वतःला त्या परमोच्च विभूतीजवळ वर नेण्याचा प्रयत्न करा; तिच्याशीं समरस व्हा; तिचें तेज आणि सौंदर्य यांत मिसळून जाऊन एकरूप होण्यासाठीं झटा. अशा रीतीनें जाणीव उच्च पायरीवर नेण्याचा प्रयत्न सारखा चालू ठेवलांत तर एक वेळ अशी येईल कीं आपण आपल्या ध्येयाशीं पूर्वीं नव्हतों इतके एकरूप झालों आहोंत, त्या ध्येयमूर्तीचें खरें स्वरूप आपणांला पूर्वींपेक्षां अधिक समजूं लागलें आहे, असें तुम्हांला आढळून येईल. एक नवा अपूर्व असा प्रकाश आपल्या जीवनांत आला आहे, जग निराळेंच दिसूं लागलें आहे, पूर्वींचें जें आपलें जीवन अंधकारमय व मृतवत् होतें तें मावळून खरें जीवन म्हणजे काय तें आपणांला आतांच समजूं लागलेलें आहे असा प्रत्यय येईल.

जाणिवेची ही उच्च अवस्था (दिव्यदृष्टि प्राप्त झाल्याची ही अवस्था) प्रथम कांहीं वेळ टिकेल, नंतर ती मावळून जाईल, आणि मग तुम्ही नेहमीच्या जगांत याल त्या वेळीं आपण अंधःकारांत आलों असें तुम्हांला वाटेल. पण तुम्ही धारणेचा हा अभ्यास चालू ठेवा म्हणजे पुनः ती स्थिति येईल. असें पुनःपुन्हां होईल. दरवेळीं ती स्थिति जास्त जास्त वेळ राहील, आणि मधून मधून कवडसे पडावे असें न होतां पुढें ती स्थिति कायम होईल. इतकी दिव्य दृष्टि हस्तगत झाल्यावर झोंपीं जातांना तुमच्या जाणिवेंत खंड पडणार नाहीं. रोज रात्रीं जेव्हां आपण झोंपतों तेव्हां आपली जाणीव बंद होते व सकाळीं उठल्यावर पुनः सुरू होते. तसें तुमचें न होतां दिवस व रात्र (जागृति व झोंप) यांमध्यें जाणिवेचें सूत्र न तुटतां शाबूत राहील. या दिव्य दृष्टीनें सभोवार पहा-

वयास लागा म्हणजे पूर्वी कल्पना नसलेल्या कितीतरी नव्या गोष्टी तुम्हांस दिसतील व आकलन होतील.[1]

तुमची जी नेहमींची जाणीव होती तिच्या एक मजला वर असलेली ही जाणीव होय. पहिल्या टप्प्यावरची ही दिव्य दृष्टि होय.[2] असे पुढें दुसरे अनेक टप्पे आहेत. वर दिलेला अभ्यास

---

१ सूक्ष्म दृष्टि प्राप्त झाल्यावर माणसानें सभोवार पाहिलें म्हणजे एक नवीन लोक व त्यातील अनेक अदृश्य पदार्थ व प्रक्रिया त्याच्या दृष्टीच्या टप्प्यांत येतात. पण त्याचा अर्थ असा नव्हे कीं त्याला त्या गोष्टींचें तपशीलवार व बिनचूक असें निरीक्षण आपोआप करतां येईल. डोळा असणाऱ्या माणसाला दृश्य सृष्टींतल्या नाना गोष्टींचें नीटपणानें निरीक्षण करतां येतेंच असें नाहीं. सहा महिन्यांच्या अर्भकाला डोळा असतो. पण तो चांदोबाला धरण्यासाठीं हात पसरतो. त्याला अंतर समजत नाहीं पुष्कळ लोकांना एकादें शेत दाखविलें तर त्यांच्या दृष्टीला त्याच्या लांबीरुंदीचा बिलकुल अजमास येत नाहीं. नवीन मिळालेल्या सूक्ष्मदृष्टीचा माणूस जेव्हां पुनः पुनः उपयोग करील, आपल्या अवलोकनांत ज्या चुका होतात त्या पुनः पुनः दुरुस्त करील, आणि आपल्या सूक्ष्मदृष्टीला शिस्त लावून तिला कार्यक्षम करील तेव्हांच त्याचें अवलोकन बिनचूक होऊं शकेल. पुष्कळ लोक ही खटपट करीत नाहींत. अर्थात त्यांना सूक्ष्मदृष्टि प्राप्त झालेली असली तरी तिचा बिनचूकपणानें उपयोग करतां येत नाहीं. त्यांनीं जर अदृश्य सृष्टीचें निरीक्षण केलें तर तें सदोष, एकांगी व कित्येक वेळा चुकीचें होतें. अदृश्य सृष्टीचें संशोधन करण्यास असलीं माणसें अनधिकारी होत. ज्यांनीं आपली सूक्ष्मदृष्टि कमावून संशोधनक्षम केलेली असेल त्यांचेंच संशोधन बिनचूक व विश्वसनीय होत असतें.

वर दिलेल्या मार्गानें ज्याला सूक्ष्मदृष्टि प्राप्त झालेली असेल त्याला कित्येक नियम पाळावे लागतात. स्वार्थासाठीं तिचा उपयोग करण्यास त्याला मुभा असत नाहीं. –अ गो. का.

२ दिव्यदृष्टि किंवा सूक्ष्मदृष्टि ही एकच वस्तु नाहीं. माणसाला वासनादेह असतो त्या देहाच्या इंद्रियशक्ति मेंदूंत आणल्या म्हणजे एका पायरीची दिव्य दृष्टि मिळाली असें होतें. त्या देहापेक्षां उच्च असे जे माणसाला देह असतात त्या देहांची इंद्रियशक्ति मेंदूंत आणतां आली म्हणजे वरच्या दर्जाच्या वेगवेगळ्या सामर्थ्याच्या दिव्य दृष्टि माणसाला प्राप्त होऊं शकतात. या लेखांत ज्या दिव्यदृष्टीच्या प्राप्तीचीं साधनें दिलेलीं आहेत ती जागृतीच्या एक मजला वरची (वासनादेहाच्या इंद्रियशक्तीची) दिव्यदृष्टि होय. याच साधनांनीं क्रमशः त्याहूनही वरवरच्या मजल्यांची दिव्य दृष्टि साध्य करून घेतां येते हें वर आलेंच आहे. –अ. गो. का.

चालू ठेवल्यास तेही तुम्हांला गांठतां येतील. जेव्हां वरच्या मजल्याची जाणीव प्राप्त होईल, पुढच्या पायरीची दिव्यदृष्टि जेव्हां मिळेल, तेव्हां दर वेळीं तुम्हांस असें वाटेल कीं आपण इतके दिवस अंधारांतच होतों व आजच नव्या ज्ञानप्रकाशांत शिरत आहोंत. अशा रीतीनें पायरीपायरीनें जीवनाच्या झऱ्याच्या सच्चिदानंदाच्या–ईश्वराच्या–अधिक अधिक संनिध तुम्ही जाऊं शकाल.

तुम्ही म्हणाल हें साधायला पुष्कळ वर्षें लागतील! होय, पुष्कळ वर्षें लागण्याचा संभव आहे हें खरें. जी उत्क्रान्ति होण्याला अनेक जन्मांचा काळ सामान्यत: लागतो, ती एका जन्मांत साधण्याचा हा प्रयत्न आहे. तेव्हां तो कठिण असावा व त्याला बराच काळ लागावा यांत आश्चर्य नाहीं.[1]

---

१ दिव्यदृष्टि संपादन करण्याचे दोनच इष्ट असे मार्ग या पुस्तकांत वाचकांसमोर ठेविलेले आहेत. पण इष्ट असे आणखीही मार्ग अस्तित्वांत आहेत. कुडंलिनी जागृत करणें, प्राणमय कोषांच्या चक्रांत प्राणशक्ति संचित करणें वगैरे अनेक मार्ग अस्तित्वांत आहेत. श्री. लेडबीटर यांनीं स्वत: कुडलिनी जागृत करण्याचा मार्ग धरलेला होता हें त्यांच्या How Theosophy Came to Me या पुस्तकावरून दिसून येतें. The astral Plane या त्यांच्या पुस्तकाच्या १९४९ च्या तिसऱ्या आवृत्तीस सी. जिनराजदास यांनीं प्रस्तावना जोडली आहे. तींतही ही माहिती आढळेल (पृ. VIII-XII) पण योग्य मार्गदर्शकाच्या अभावीं असल्या मार्गांत फार धोका असल्यामुळें ते श्री. लेडबीटर यांनीं मुद्दाम वगळले आहेत. –अ. गो. का.

कव्हर पान २ वरून चालू ]

भवावर आधारलेलें शास्त्र आहे तसें **धर्म हेंही अदृश्यसृष्टीच्या अनुभवावर आधारलेलें शास्त्र** आहे, ही थिऑसफीची शिकवण धर्म व सायन्स या दोन्ही क्षेत्रांमध्यें बंधुत्व निर्माण करूं शकेल. जगांतील सर्व क्षेत्रांत बंधुत्वाची भावना वाढविणें हें थिऑसफीचें मुख्य ध्येय आहे. माणसांमाणसांमधील बंधुत्वाची भावना जोरदार करून जगांतील अन्याय, दारिद्रय व दुःख हीं नष्ट करतां येतील, असें थिऑसफीचें सांगणें आहे.

शास्त्रज्ञ जसें दृश्यसृष्टीचें संशोधन करतात तद्वत् थिऑसफीनें अदृश्य-सृष्टीचें संशोधन केलेलें आहे व त्या आधारावर **धर्माची एक नवीन मांडणी** जनतेसमोर ठेविली आहे. ही मांडणी प्रत्येकाच्या मनांत स्वतःच्या धर्माबद्दल आदर निर्माण करून त्यांतील रहस्य स्पष्ट करते व त्याबरोबरच जगांतील इतर धर्माबद्दल सहानुभूति निर्माण करते. ती मांडणी अनेक प्रश्नांस समर्पक उत्तरेंहि देते. मृत्यु म्हणजे काय ? मृत्यूनंतर जीव शाबूद रहातो का ? माणसाला एक जन्म असतो कीं अनेक असतात ? माणसाची उत्क्रांति कशी होते ? ईश्वर आहे का ? मानवी इतिहासाच्या पाठीशीं कोणी सूत्रधार आहेत का ? जगाची नवीन घडी कशी बसवितां येईल ? असल्या प्रश्नांस थिऑसफींत नवीन रीतीचीं व समर्पक उत्तरें देण्यांत येत असतात.

बंधुत्वाची आवड असणाऱ्या कोणत्याहि जिज्ञासूला थिऑसॉफिकल सोसायटीचा सभासद होतां येतें. **थि. सोसायटींत संपूर्ण मतस्वातंत्र्य आहे.** थिऑसफीच्या अमुक एका सिद्धान्तावर सभासदानें श्रद्धा ठेवली पाहिजे असा कोणताही निर्बंध नाहीं.

थिऑसॉफिकल सोसायटीची **घटना लोकशाहीस धरून आहे**. तिचे **सध्यांचे** लोकनियुक्त अध्यक्ष श्री. एन. श्रीराम हे आहेत. तिचें आंतरराष्ट्रीय मुख्य पीठ मद्रासनजीक अड्यार येथें आहे. हिंदुस्थानांतील मराठाच्या प्रांतांत तिच्या १६ शाखा आहेत.

**या शाखांस संघटित करणाऱ्या संस्थेस मराठी थिऑसॉफिकल फेडरेशन म्हणतात.** तिचे सध्यांचे **अध्यक्ष** श्री. राजाराम सखाराम भागवत, एम्. ए. पोलिस लाईनजवळ, ठाणें हे आहेत. **चिटणीस** श्री. गंगाधर रघुनाथ भडभडे, बी. ए. एल्एल्. बी. १८ गणेशवाडी, पुणें ४; व श्री. गोपाळ हरी कुंटे, बी. एस्सी, सेवानिवृत्त प्राध्यापक, ७८१ रविवार नाशिक हे आहेत. त्यांचे-पैकीं कोणाहिकडून जास्त माहिती जिज्ञासूंस मिळूं शकेल.

# मराठी थिऑसफिकल फेडरेशननें प्रसिद्ध केलेलीं पुस्तकें

| | | |
|---|---|---|
| १. | **थिऑसफीवरील सुबोध व्याख्यानें** | रु. आ. |
| | भाषांतरकार कै. वा. दे. भा. लेले, बी. ए. | ०–१२ |
| २. | **सिद्धपुरुष व त्यांचा संप्रदाय** | |
| | ले. वा. ल. चिपळूणकर व रा स. भागवत | १–१२ |
| ३. | **हिंदु सामुदायिक पूजा** (सार्थ व सटीप) ले. रा.स. भागवत | ०– ४ |
| ४. | **महम्मद पैगंबर व त्यांचा इस्लामधर्म**–ले वा. ल. चिपळूणकर | ०– ४ |
| ५. | **मृत्यूनंतर काय ?**–ले. रा. स. भागवत एम् ए. | ०– ४ |
| ६. | **ईश्वर आहे काय ?**–ले. रा. स. भागवत | ०– ४ |
| ७. | **थिऑसफी म्हणजे काय ?**–ले. रा. स. भागवत एम्. ए. | ०– ४ |
| ८. | **साधनचतुष्टय**–"कृष्णजी"–कृत "At the Feet of the Master"चें मराठी भाषांतर | ०– ८ |
| ९. | **जीवनाचा हेतु**–लेखक वा. ल. चिपळूणकर | ०– ४ |
| १०. | **थिऑसफींत नवीन काय आहे ?** | |
| | ले. वा. ल. चिपळूणकर व रा. स. भागवत | ०– ४ |
| ११. | **थिऑसफी व जनतेच्या दारिद्र्याची हकालपट्टी** | |
| | ले रा. स भागवत | ०– ४ |
| १२. | **श्रद्धा कीं चिकित्सा** | |
| | ले. वा. ल. चिपळूणकर व रा स. भागवत | ०– ४ |
| १३ | **दिव्यदृष्टि कशी संपादन करतां येते ?**– ले. श्री. सी. डब्ल्यू. लेडबीटर | |
| | अनुवादक– अ. मो. कानिटकर बी. ए बी. ई | ०– ४ |

---

| | | |
|---|---|---|
| १. | **बेझंट चरित्र**–आवृत्ति २ री (१९४७) ले. रा. स. भागवत | २– ० |
| २. | **राजयोगाचीं मूलतत्त्वें व अभ्यास**–ले. रा. स. भागवत | १– ८ |
| ३. | **मृत्यु व मृत्यूनंतर**–ले. रा. स. भागवत, एम्. ए. | १– ८ |
| ४. | **स्वप्नसृष्टि**- ले. ज. ना. ढगे, एम्. ए. | १– ८ |
| ५ | **महाराष्ट्रांतील संत व त्यांचे साक्षात्कार**–ले. रा. स. भागवत | १– ८ |
| ६. | **ईश्वर आहे कीं नाहीं ?** –ले. रा. स. भागवत | १– ८ |

## आगामीं प्रकाशनें ( प्रत्येकीं किंमत १॥ रुपया )

★ धर्म म्हणजे काय ? नीति म्हणजे काय ? तत्त्वज्ञान म्हणजे काय ? ★ आत्मविद्येचीं मूलतत्त्वें (पुनर्मुद्रण). ★ आपण पुनःपुनः जन्मास येतों काय ? ★ पुनर्जन्मसिद्धांत व त्याचें विवेचन. ★ माणसाला आत्मा असतो काय ? ★ भारतीय संस्कृति व आजचे प्रश्न. ★ भारतीय संस्कृति व सम्राट अशोक. ★ पुनर्जन्म व कर्म. ★ मरणोत्तर स्थिति व हिंदुधर्म. ★ भुतें आहेत का ?

वरील पुस्तकें पुढील पत्त्यावर चौकशी केल्यास मिळूं शकतील :–

**श्री. दत्तात्रय गोविंद काळे**, बी. ए., 'गोविंदभुवन' आपटे रोड, पुणें ४.